**राज्यातील मराठा समाजाला आरक्षण देण्याच्या संदर्भातील न्यायालयीन प्रकरणांबाबत कार्यवाही व इतर अनुषंगिक कार्यवाहीकरीता होणारा खर्च भागविण्यासाठी निधी उपलब्ध करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीबीसी-१०/२०१६/प्र.क्र.२८१/मावक**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई- ४०० ०३२.
दिनांकः ०८ मार्च, २०१७

वाचा:-

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक सीबीसी/२०१३/प्र.क्र.३५/मावक दिनांक २१ मार्च, २०१३
२) शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक सीबीसी-१०/२०१४/प्र.क्र.३३/मावक दिनांक ४ मार्च, २०१४

**शासन निर्णय:-**

राज्यातील मराठा समाजाचा मागास प्रवर्गामध्ये समावेश करण्यासंदर्भात आढावा घेऊन योग्य त्या शिफारशी करण्यासाठी मा. मंत्री (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली होती. सदर समितीचे सदस्य सचिव, महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे आहेत. समितीने घेतलेल्या निर्णयानुसार मराठा समाजाच्या आर्थिक, सामाजिक व शैक्षणिक मागासलेपणाबाबत सर्व जिल्हाधिकारी यांचेकडून सर्वेक्षण करण्यात येत होते. सदर सर्वेक्षणासाठी व कार्यालयीन खर्चासाठी संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयान्वये रू. १०,००,००,०००/- (रूपये दहा कोटी फक्त) इतकी रक्कम उपलब्ध करून देण्यात आली होती. माहे नोव्हेंबर, २०१६ पर्यंत सदर रक्कमेतील रूपये ८,७०,८४,७९८/- रूपये ( रूपये आठ कोटी सत्तर लक्ष चौ-याऐंशी हजार सातशे अठ्ठ्याण्णव ) इतका खर्च झालेला असल्याने आणि पुढील कालावधीत मराठा समाजास आरक्षण देण्याच्या संदर्भातील न्यायालयीन प्रकरणे, इतर अनुषंगिक खर्चाकरीता अधिक निधीची आवश्यकता असल्याने सद्यःस्थितीत महासंचालक, डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांना निधी उपलब्ध करून देणे गरजेचे आहे.

२. सन २०१७-१८ या आर्थिक वर्षासाठी वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र. ८९/अर्थ-३, दि. ८ फेब्रुवारी, २०१७ मधील सुचनेनुसार विषयांकित खर्चाकरीता रू १,८०,००,०००/- (रूपये एक कोटी ऐंशी लक्ष फक्त) इतकी रक्कम वित्त विभागाच्या मान्यतेने मंजूर करण्यात येत आहे. शासन निर्णय संदर्भाधीन क्र.१ अन्वये महासंचालक, डॅा. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्याकडे त्वरीत सुपूर्द करण्यासाठी संशोधन अधिकारी, महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोग, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित केले आहे. सदरहू रक्कम ज्या प्रयोजनार्थ अनुज्ञेय आहे त्याच प्रयोजनार्थ वापरण्यात यावी.

३. सदरहू खर्च मागणी क्र. एन-३, २२५ अनुसुचित जाती, अनुसुचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण ०१ अनुसुचित जातीचे कल्याण ००१ संचालन व प्रशासन (०१) सामाजिक कल्याण संचालनालय (०१) (०१) सामाजिक न्याय संचालनालय (मागासवर्ग शाखा) (२२२५ ००९२), (१३) कार्यालयीन खर्च (योजनेत्तर) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येऊन हा खर्च पुरवणी मागणीव्दारे मंजूर करण्यात आलेल्या रू १,८०,००,०००/- (रूपये एक कोटी ऐंशी लक्ष फक्त) या तरतुदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक क्र. २०१७०३०८१३०९२८७६२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dinesh Ramchandra Dingle

Digitally signed by Dinesh Ramchandra Dingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd836467a8648a8d21dc84bc01be, cn=Dinesh Ramchandra Dingle
Date: 2017.03.08 13:10:19 +05'30'

**( दि. रा. डिंगळे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. महालेखापाल, महाराष्ट्र, मुंबई
२. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर
३. आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. महासंचालक, डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
५. संशोधन अधिकारी, महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोग, पुणे
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९. वित्त विभाग (व्यय१५/अर्थसंकल्प-३/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई
१०. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
११. निवड नस्ती, का-मावक.